**जिल्हा परिषदामध्ये स्थापन करण्यात आलेल्या महिला व बाल कल्याण समितीने राबवावयाच्या योजना.**

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
**शासन शुध्दीपत्रक क्रं.:झेडपीए/२०१०/अनौसक्रं/३३/प्रक्र.१६८/पंरा-१.**
मंत्रालय, मुंबई - ४००० ३२
**दिनांक २२ जुलै २०११**

**वाचा : शासन निर्णय क्रं. झेडपीए/२०१०/अनौसंक्रं/३३/प्रक्रं.१६८/पंरा-१. दिनांक १० मार्च २०११**

**शासन शुध्दीपत्रक**

**गट "अ" : प्रशिक्षण व सक्षमीकरणाच्या योजना.**

१. **योजना क्रं. ५ मध्ये १० वी व १२ वी पास मुलींना संगणक प्रशिक्षण देणे**

या योजनेतील शेवटच्या ओळीनंतर एमएस-सीआयटी व समकक्ष असणारे अभ्यासक्रम गतवर्षांत पूर्ण करणाऱ्या (सन २०१०-११) लाभार्थ्यांना चालू वर्षांत या योजनेचा लाभ घेता येणार नाही असे वाचावे.

२. **पंचायत महिला शक्ती अभियान अंतर्गत मार्गदशन केंद्र स्थापन करणे**

पंचायत महिला शक्ती अभियान अंतर्गत ग्रामपंचायत, पंचायत समिती व जिल्हा परिषद महिला सदस्यांसाठी जिल्हा परिषदेत मार्गदर्शन केंद्र असावे. मार्गदर्शन केंद्रात एका एमएसडब्ल्यू मार्गदर्शकाची कंत्राटी पध्दतीने किंवा संस्थेची Outsource करुन नेमणूक करावी. तसेच महिला प्रतिनिधीसाठी प्रशिक्षण व मेळाव्याचे आयोजन करावे. यासाठी जिल्हा परिषदांनी दरवर्षी रुपये ५ लाखाची तरतूद करावी. या नवीन योजनेचा समावेश करण्यात येत आहे.

**गट ब च्या योजना (वस्तू खरेदीच्या योजना)**

३. **योजना क्रं. १५ - महिलांना साहित्य पुरविणे**

या योजनेमध्ये दिलेल्या साहित्य खरेदी व्यतिरिक्त शिलाई मशीन, पिको फॉल मशीन, मिरची कांडप मशीन, अंगणवाडयांना गॅस सुविधा आणि त्यांच्यासाठी प्रेशर कुकर, अन्न शिजविण्यासाठी भांडी इ. समावेश करण्यात येत आहे. हे साहित्य फक्त २०११-१२ या वर्षासाठीच पुरविण्यात यावे, तसेच वस्तू वाटप करताना " प्रति महिला जास्तीत जास्त रुपये १०,०००/-खर्च करण्यांत यावा" या ऐवजी "प्रति महिला रुपये २०,०००/-पेक्षा जास्त खर्च करु नये" असे वाचावे.

**४. (इ. ५ वी ते १० वी पर्यंत शिकणाऱ्या) मुलींसाठी सायकली पुरविणे.**

दुर्गम भागात किंवा इतर ठिकाणी विद्यार्थीनींना त्यांचे रहात्या गावापासून ज्या ठिकाणी कमीत कमी २ कि. मी. अंतर चालत जावे लागते, अशा विद्यार्थीनींना मोफत सायकली पुरविण्या बाबतची ही योजना आहे. सर्वसाधारण लाभार्थ्यांना सदर योजनेचा लाभ देण्यात येईल. परंतु लाभ देताना दारिद्रय रेषेखालील कुटुंबातील पात्र विद्यार्थीनींचा

प्राधान्याने विचार करणेत यावा. या योजनेखाली किती लाभार्थ्यांना लाभ द्यावा या बाबतचा निर्णय जिल्हा परिषदेने घ्यावयाचा आहे. या नवीन योजनेचा समावेश करण्यात येत आहे.

५. " गट ब च्या योजनांवर म्हणजे वस्तू व साहीत्य खरेदीवर एकूण खर्चाच्या ३० % पेक्षा जास्त खर्च करु नये म्हणजे गट अ च्या योजनांवर जास्त भर द्यावा व त्यावर किमान ७० % खर्च करण्यात यावा. एकूण खर्चाच्या ३ % रक्कम अपंग महिला व बालकांसाठी खर्च करण्यात यावी" या ऐवजी "गट अ च्या प्रशिक्षण व सक्षमीकरणाच्या योजनांसाठी समितीच्या एकूण निधी पैकी ५० % आणि वस्तू खरेदीच्या योजनांसाठी एकूण ५० % निधी खर्च करण्यात यावा, परंतु गट अ वरील खर्च रुपये १ कोटी पेक्षा जास्त होत असल्यास उर्वरीत निधी गट ब च्या योजनांकडे वळविण्याची मुभा राहील. एकूण खर्चाच्या ३ % रक्कम अपंग महिला आणि बालकांसाठी खर्च करण्यांत यावी" . असे वाचावे.

६. शासन निर्णय दिनांक १० मार्च २०११ मधील योजना सन २०११-१२ या आर्थिक वर्षापासून जिल्हा परिषदेतील महिला व बाल कल्याण समितीने राबविणे बंधनकारक राहील. त्यामुळे दिनांक १९ डिसेंबर २००७ च्या शासन निर्णया नुसार या पुढे योजना राबविण्यात येऊनयेत.

७. सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यांत आले असून, त्याचा संगणक संकेतांक २०११०७२२१६१८०२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशा नुसार व नावाने,

(डॉ. मल्लीनाथ कलशेटटी)
उप सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२) मा. मंत्री ग्रामविकास यांचे खाजगी सचिव.
३) मा. राज्यमंत्री, ग्राम विकास यांचे खाजगी सचिव.
४) मा. अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व) ( मु का अ यांचे मार्फत)
५) मा. विधान परिषद / मा. विधानसभा सदस्य (सर्व)
६) प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.
७) विभागीय आयुक्त (सर्व)
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
९) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, ३ चर्च रोड, पुणे ४११ ००१.
१०) संचालक, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, कोकण भवन, नवी मुंबई.
११) निवड नस्ती, कार्यासन क्रं. पंरा/१, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.

प्रत,

१) मा. सचिव, महिलांचे हक्क व कल्याण समिती, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
२) मा. सचिव, पंचायत राज समिती, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई यांचेकडे माहितीसाठी रवाना.